# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक–पोप्रमा-०३१७/प्र.क्र.२५३/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २८ जुलै २०१७.

**विषय** :- नवीन पोलीस वसाहत, माहीम येथील इमारत क्र. ७,८,९,१३,१४,१५,१६,१७,१८ व १९ यांमधील (विद्युत) मोटार पंप बदलण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-८(४)/२२३७/२०१७, दिनांक ०७.०३.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी नवीन पोलीस वसाहत, माहीम येथील इमारत क्र. ७,८,९,१३,१४,१५,१६,१७,१८ व १९ यांमधील (विद्युत) मोटार पंप बदलण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी, सहायक अभियंता, श्रेणी-२, विद्युत (सार्वजनिक बांधकाम) उप-विभाग, दादर, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.२४,४५,५६४/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज, कार्यकारी अभियंता, (सार्वजनिक बांधकाम) विद्युत विभाग, मध्य मुंबई, यांनी साक्षांकित केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| **अ.क्र.** (१) | **इमारत क्रमांक** (२) | **खर्चाचे अंदाज** (३) |
|---|---|---|
| १ | १७ व १८ | रु.५,५१,१८५/- |
| २ | ७, ८ व ९ | रु.५,५६,७७९/- |
| ३ | १४ व १९ | रु.५,५७,११३/- |
| ४ | १३ | रु.२,३६,३७८/- |
| ५ | १५ व १६ | रु.५,४४,१०९/- |
| **एकूण** | | **रु.२४,४५,५६४/-** |

**४.** त्या अनुसार, नवीन पोलीस वसाहत, माहीम येथील इमारत क्र. ७,८,९,१३,१४,१५,१६,१७,१८ व १९ यांमधील (विद्युत) मोटार पंप बदलण्याकरिता, परिच्छेद ३ मधील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, **रु.२४,४५,५६४/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) पोलीस उप-आयुक्त (मुख्यालय-२), बृहन्मुंबई, यांनी खर्चाचे अंदाज साक्षांकित करावे.
२) निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस, (०२) शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशी्र्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९४/इमा-२, दिनांक १९.०४.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२९१०३६०१५६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.29 10:42:29 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सार्वजनिक बांधकाम) विद्युत विभाग, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).